आरोग्यवर्धिनी केंद्रामध्ये नियुक्त होणाऱ्या
आयुर्वेद पदवीधारकांसाठी महाराष्ट्र
आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक अंतर्गत
सहा महिन्याच्या प्रशिक्षण अभ्यासक्रमास
मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमईडी १०१८/प्र.क्र.२७०/१८/शिक्षण-२**
०९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०९ ऑगस्ट ,२०१८

**वाचा:-** आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राओसोम/आरोग्यवर्धिनी/मआविविना/९४५/शिकाना/१८, दि. १३/०७/२०१८

**प्रस्तावना**:-

राष्ट्रीय आरोग्य धोरण, २०१७ मध्ये जनतेस गुणवत्तापूर्ण प्राथमिक आरोग्याची सेवा पुरविण्याचा केंद्र शासनाने निर्णय घेतला असून त्यानुसार सदर सेवा मुख्यत्वे आरोग्यवर्धिनी केंद्र (Health and Wellness Centre) यांच्यामार्फत पुरविणे अभिप्रेत आहे. आरोग्यवर्धिनी केंद्रामार्फत जनतेस व्यापक प्रमाणात प्राथमिक आरोग्य सेवा (Comprehensive Primary Health Care) पुरविण्याचा मानस असून फेब्रुवारी २०१८ मध्ये भारत सरकारने संपूर्ण देशात १.५ लक्ष प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रांचे रुपांतर आरोग्यवर्धिनी केंद्रात करण्याचे ठरविले आहे. त्यापैकी महाराष्ट्र राज्यात १२४१५ आरोग्यवर्धिनी केंद्रे स्थापन करावयाची आहेत.

प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रे ही आरोग्यवर्धिनी केंद्रामध्ये रुपांतरित झाल्यानंतरसुध्दा प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रे येथे सध्या अस्तित्वात असलेल्या कुटूंब कल्याण, माता व बाल आरोग्य सेवा, सांसर्गिक आजाराचे नियोजन व उपचाराच्या सेवा देण्यात येणार असून त्याव्यतिरिक्त असांसर्गिक आजार, कान-नाक-घशाचे आजार, दृष्टीसंबंधी आजार, अपघात इत्यादी आरोग्य सेवा सुध्दा पुरविण्यात येणार आहेत. महाराष्ट्र राज्यामध्ये आरोग्यवर्धिनी केंद्रामध्ये आयुर्वेदिक पदवीधारकांना मध्यम स्तरावरील सेवा प्रदाता (Midlevel

Service Provider) म्हणून नेमण्यात येणार आहे. यासाठी नियुक्ती होणाऱ्या आयुर्वेद पदवीधारकांना आरोग्यवर्धिनी योजनेंतर्गत अपेक्षित सर्व सेवा देण्याबाबतचे प्रशिक्षण देण्यासाठी महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठामार्फत अभ्यासक्रम राबविण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये आरोग्यवर्धिनी योजनेंतर्गत मध्यमस्तरीय सेवा प्रदाता म्हणून नियुक्त करावयाच्या आयुर्वेद पदवीधारकांना सदर योजनेतंर्गत अपेक्षित सर्व सेवा देण्याबाबतचे प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठामार्फत “आधुनिक मध्यमस्तरीय सेवा प्रदाता अभ्यासक्रम” हा सहा महिने कालावधीचा अभ्यासक्रम राबविण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर अभ्यासक्रम राबविण्याच्या अनुषंगाने खाली नमूद अटी व शर्ती विहीत करण्यात येत आहेत:-

१) सदर अभ्यासक्रम हा सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील किमान २०० खाटांच्या शासकीय संस्थांमध्ये ५० प्रवेशक्षमतेसह सुरु करण्यात यावा.

२) उक्त अभ्यासक्रमाचा पाठयक्रम (Syllabus) हा महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यालयाची आवश्यकता विचारात घेऊन तयार करावा.

३) सदर अभ्यासक्रमाचा प्रशिक्षण कालावधी हा सहा महिन्यांचा राहिल.

४) सदर अभ्यासक्रमाची शुल्क निश्चिती महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठामार्फत करण्यात यावी.

५) सदर अभ्यासक्रम प्रवेशासाठी आयुक्त(आरोग्य सेवा) यांनी प्राधिकृत केलेले आणि महाराष्ट्र भारतीय चिकित्सा परिषदेकडे नोंदणीकृत असलेले आयुर्वेद व्यवसायी पात्र असतील.

६)सदर अभ्यासक्रम यशस्वीपणे उत्तीर्ण करणाऱ्या उमेदवारास महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांच्यामार्फत आधुनिक मध्यमस्तरीय सेवा प्रदाता अभ्यासक्रम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र प्रदान करण्यात यावे.

७)सदर अर्हताधारक केवळ महाराष्ट्र राज्यामध्येच आणि आरोग्यवर्धिनी केंद्रामध्ये प्रशिक्षणानंतरच्या सेवा देण्यास पात्र राहतील.

८)जिल्हा रुग्णालयातील तज्ञ हे सदर अभ्यासक्रमासाठी प्रशिक्षक म्हणून कार्यरत राहतील. सदर प्रशिक्षकांना महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांच्यामार्फत प्रशिक्षक म्हणून मान्यता देण्याची विद्यापीठाच्या नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर आदेश हे सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८०८०९ १६१००१६२१३असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2018.08.09 17:52:46 +05'30'

**(सुरेन्द्र चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व सहसचिव/उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, फोर्ट, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
संचालक, आयुष संचालनालय, मुंबई
कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
निवडनस्ती (शिक्षण-२)